**सन २०१४-१५ साठी एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत जाहीरात व प्रसिध्दीसाठी वितरीत केलेला रु.१५.०० कोटी निधी एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान अंतर्गतच्या कामासाठीच खर्च करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१३२/९अे,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
तारीख: १२ फेब्रुवारी, २०१५

**वाचा**

1. **केंद्र शासनाचे पत्र क्रमांक एफ-नं-३३-४०/२०१४-हॉर्टी,दिनांक १७ एप्रिल,२०१४**
2. **शासन निर्णय: कृषी व पदुम विभाग,क्रमांक-संकीर्ण-१६१४/प्र.क्र.८५/१४-अे,दि. १०/६/२०१४**
3. **शासन पत्र, कृ व पदुम विभाग,क्र.आरकेव्ही-०५१४/प्र.क्र.२६/आरकेव्हीवाय सेल,दि.१८/७/२०१४**

**पुरकपत्र -:**

राज्यात सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने सन २००५-०६ व २००६-०७ मध्ये राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी १००% निधी उपलब्ध करुन दिला होता. सन-२००७-०८ या आर्थिक वर्षापासून सन २०१३-१४ पर्यंत सदर अभियान राबविण्यासाठी केंद्र शासनाचा ८५% हिस्सा व राज्य शासनाचा १५% हिस्सा या प्रमाणे हा कार्यक्रम राबविण्यात येत आहे. सन २०१४-१५ मध्ये सुध्दा सदर योजना ही एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान म्हणून राबविण्यात येत असून त्यामधील केंद्र हिस्सा ८५% व राज्य हिस्सा १५ % असे प्रमाण असणार आहे.

केंद्र शासनाने प्रस्तुत योजनेसाठी त्यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये रु.१८७,००,००,०००/- कोटी (रुपये एकशे सत्याऐशी कोटी फक्त) एवढया रक्कमेच्या कार्यक्रमास मान्यता दिली आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात एकात्मिक फलोत्पादन अभियान अंतर्गत १५ टक्के राज्य हिश्श्यापोटी रु.२५.०० कोटी एवढी अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याने फलोत्पादन क्षेत्रामध्ये केलेल्या नेत्रदिपक कामगिरीची जाहीरात व प्रसिध्दी करण्यासाठी रु.१५.०० कोटी (रुपये पंधरा कोटी फक्त) इतका निधी उपरोक्त राज्य हिश्श्यांच्या निधीतून वितरीत करण्यात आलेला आहे. तथापि सदर प्रयोजनेसाठी राष्ट्रीय कृषी विकास योजनेतूनसुध्दा संदर्भ क्र.३ अन्वये निधी वितरीत करण्यात आलेला असल्याने उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये वितरीत केलेला रु.१५.०० कोटी इतका निधी अद्याप अखर्चीत राहीलेला आहे.

२. त्यामुळे सद्यस्थितीत व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांचेकडे संदर्भ क्र.२ अन्वये वितरीत करण्यात आलेला निधी व अद्यापही अखर्चीत

असलेला निधी यापुढे एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानाअंतर्गत कार्यान्वीत असलेल्या विविध योजनांसाठीच व शासनाने याबाबत विशिष्ट मान्यतेचे आदेश निर्गमीत केल्यानंतरच खर्च करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशीत केलेले आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१२१५२५००६८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.02.13 13:10:54 +05'30'

**अ.नि.साखरकर**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.मंत्री (कृषी) यांचक खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.अपर मुख्य सचिव, (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक ,मंत्रालय, मुंबई-३२.
३) आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
६) सर्व संचालक / सर्व सहसंचालक , कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व विभागीय कृषी सहसंचाल
८) सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
९) सहाय्यक संचालक (लेखा), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य , पुणे.
१०) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३) सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन , ५ वा मजला , मुंबई-३२.
१४) माहीती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) नियोजन विभाग, (कार्यासन-१४३१) मंत्रालय ,मुंबई / वित्त विभाग (व्यय-१) अर्थसंकल्प-३,१२.
१६) निवडनस्ती (९- अे कार्यासन )